१ जुन, २०१५ रोजी देय झालेल्या आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्याची (ग्रामीण) परतफेड करण्यासाठी रोख अनुदान (लेखाशीर्ष २२१५ ११७३)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एलआयसी-२०१५/प्र.क्र.९६/पापु-०४

७ वा मजला, जी.टी.रुग्णालय संकुल,
टिळक रोड, मंत्रालय,मुंबई-४०० ००१
तारीख: ९ जून, २०१५

वाचा

1) **ग्रामविकास विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांकःएलआयसी-१०८७/सीआर-५४४/५९, दि. २ मे, १९८९.**
2) **ग्रामविकास विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांकः एलआयसी-१०८७/सीआर-५४४/५९, दिनांक १९ ऑक्टोंबर, १९८९.**

प्रस्तावना

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून वर्ष २००१-२००२ अखेरपर्यंत जिल्हा परिषदांना मंजूर झालेल्या कर्जाच्या दि. १ जुन,२०१५ रोजी परतफेडीसाठी देय झालेल्या आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्यापोटी, मुद्दल आणि व्याज अशा एकूण रक्कम रुपये १२,८२,६६,५९८/- (रु.बारा कोटी, ब्याऐंशी लाख, सहासष्ट हजार, पाचशे अठ्ठयाण्णव फक्त) भारतीय आयुर्विमा महामंडळाकडे भरणा करण्याकरिता उपरोक्त नमूद केलेल्या ग्राम विकास विभागाच्या दि. २ मे, १९८९ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास रोख अनुदान मंजूर करावयाचे आहे.

## शासन निर्णय

सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात भारतीय आयुर्विमा महामंडळाकडील कर्जाच्या परतफेडीसाठी रु.१९५३.१३ लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीतून दि. १ जुन,२०१५ रोजी परतफेडीसाठी देय झालेले मुद्दल रु.७,९५,२५,५६०/- आणि रु.४,८७,४१,०३८/- व्याज अशी एकूण रक्कम रु. १२,८२,६६,५९८/- ( रु.बारा कोटी ब्याऐंशी लाख सहासष्ट हजार पाचशे अठ्ठयाण्णव फक्त ) ची परतफेड भारतीय आयुर्विमा महामंडळास करण्याकरिता रु.१२,८२,६६,५९८/- एवढे रोख अनुदान सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना मंजूर करीत आहे.

२.	हे अनुदान कोषागारातून प्राप्त करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या श्री. सु. से डांगे, संचालक (वित्त) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व श्री. शां. सि. कुदळे, उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतीस्वाक्षरीत केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांस सादर करावे. ही मंजूर रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास भरणा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची आहे. सदर रक्कम इसीएस प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३.	शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र. आरसीएन- १०८९/सीआर- ३०२७ /२८,दिनांक ५ सप्टेंबर, १९९० मधील सूचना प्रमाणे अनुदानाच्या खर्चाचा महालेखापालांच्या मुंबई कार्यालयातील नोंदलेल्या खर्चाशी मेळ घालावा व ताळमेळाचा विहीत अहवाल शासनाकडे पाठवावा.

४.	या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान एकूण रक्कम रु १२,८२,६६,५९८/- (रु.बारा कोटी, ब्याऐंशी लाख, सहासष्ट हजार, पाचशे अठ्ठयाण्णव फक्त) चा खर्च पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग - मागणी क्र. वाय- २ - लेखाशीर्ष " २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता - ०१ पाणी पुरवठा - १०२ - ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (०१) स्थानिक क्षेत्र -(०१) (०१) ग्रामीण पिण्याचे पाणी पुरवठा योजनांकरिता आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाच्या देय रकमांच्या परतफेडीबाबतचा खर्च भागविण्यासाठी जिल्हा परिषदांना अनुदाने ( २२१५ ११७३ ) ३१, सहाय्यक अनुदाने " (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा आणि त्या खाली सन- २०१५-२०१६ वर्षाकरीता उपलब्ध योजनेतर तरतूदीतून हा खर्च भागववावा.

५.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २८९/व्यय-३,दि.१८.०५.२०१५ अन्वये त्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०३१५२४०६१५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shantaram S Kudale

Digitally signed by Shantaram S Kudale
DN: CN = Shantaram S Kudale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.09 14:31:15 +05'30'

**( शां.सि.कुदळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,एक्सप्रेस टावर्स, ४ था मजला, मुंबई- ४०० ०२१.

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ).

३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.

४. अधिक्षक अभियंता,( सीपीडीएम ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.

५. महालेखापाल, महाराष्ट्र - १ / २ , मुंबई / नागपूर ( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ).

६. निवासी लेखाधिकारी, मुंबई - ४०० ०२१.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, परीक्षा संचालनालय,महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई.

९. कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ( सर्व ).

१०.उपमुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,कोकण भवन,नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/ नागपूर.

११.वित्त विभाग, ( व्यय-३ / अर्थोपाय ) मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

१२.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्र. पापु-२०.

१३.निवड नस्ती ( का. क्र. पापु-०४ ), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.